डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेच्या १० अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.
(कालावधी दि. १.०९.२०१५ ते २९.०२.२०१६)

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांकः विप्रप्र-२०१५/२६१/प्र.क्र.६७/१५/१२-अ
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीखः १ सप्टेंबर, २०१५

वाचा

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- टिआरएन-२०११/प्र.क्र.२८७/११/१२-अ, दिनांक १४ ऑक्टोबर,२०१३.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- मप्रप्र-२०१३/५२३/प्र.क्र.८५/१३/१२-अ, दिनांक १३ मार्च,२०१४.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- विप्रप्र-२०१४/४०६/प्र.क्र.६४/१४/१२-अ, दिनांक २८ एप्रिल, २०१४.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- विप्रप्र-२०१५/२६१/प्र.क्र.६७/१५/१२-अ, दिनांक २४ एप्रिल, २०१५.
५) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:- पदनि-२०१५/प्र.क्र.५/१५/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २० फेब्रुवारी, २०१५
६) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक:-यशदा-२०१४/४४१/प्र.क्र.९३/१४/१२-अ, दिनांक ११ मे, २०१५
७) संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी,अमरावती यांचे क्रमांक प्रशा/कलि/कावि-१११/२०१५ दिनांक १९ ऑगस्ट,२०१५ चे पत्र.

**शासन निर्णय :-**

डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण संस्था, अमरावती या संस्थेच्या १० अस्थायी पदांना संदर्भाधीन शासन निर्णय क्र.३ अन्वये दिनांक १.३.२०१४ ते दि.२८.०२.२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. त्यानंतर पुन्हा संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये विदर्भ प्रबोधिनीतील १० अस्थायी पदांना दि.१.३.२०१५ ते ३१.०८.२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आता सदर पदांना देण्यात आलेली मुदतवाढ दिनांक ३१.०८.२०१५ रोजी संपुष्टात आली असून संचालक, विदर्भ प्रबोधिनी, अमरावती यांनी संदर्भाधीन क्र.७ च्या पत्रान्वये प्रस्तुत १० अस्थायी पदांना स्थायी करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. राज्य प्रशिक्षण धोरण-२०११ च्या शासन निर्णयान्वये राज्य शासन सेवेतील सर्व संवर्गातील अधिकारी/ कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्याचे निश्चित करण्यात आले आहे. त्यानुसार वर्ग-२ व वर्ग-३ च्या अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्याकरिता संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील ६ महसूली विभागाच्या स्तरावर ६ विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था घोषित करण्यात आल्या आहेत.सदर

संस्थांच्या पदांमध्ये असलेली तफावत दूर करण्याच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र. ६ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील ६ विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांसाठी २० पदांचा एकसमान आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. त्यात निश्चित करण्यात आलेल्या २० पदांच्या अनुषंगाने विदर्भ प्रबोधिनी,अमरावती या संस्थेकडून सदर पदे भरण्याबाबत जाहिरात देण्यात आली होती.

उपरोक्त संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या कार्यपध्दतीनुसार तीन अधिकारी/ कर्मचारी यांची विहीत पध्दतीने मुलाखत घेऊन सदर पदांसाठी संचालक,विदर्भ प्रबोधिनी,अमरावती यांनी शिफारस देखील केली आहे. त्यानुषंगाने सदर अधिकारी/ कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीच्या प्रस्तावाबाबत त्यांच्या मूळ विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करून घेणे, त्यानंतर त्यांच्या प्रतिनियुक्तीचे आदेश निर्गमित करणे या प्रक्रीयेस काही कालावधी लागण्याची शक्यता आहे.

तसेच, सदर संस्थेत सद्यस्थितीत राज्य प्रशिक्षण धोरणाच्या अनुषंगाने प्रशासकीय प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित केले जात आहेत. तसेच, एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कायर्क्रमाच्या अनुषंगाने १३३ नायब तहसीलदारांचे तांत्रिक प्रशिक्षण विदर्भ प्रबोधिनी,अमरावती येथे आयोजित केले आहे. तेव्हा सदर प्रबोधिनीतील प्रशिक्षण कार्यक्रमांचा वाढता व्याप व संस्थेतील रिक्त पदे तातडीने भरण्याची आवश्यकता लक्षात घेता, विदर्भ प्रबोधिनी,अमरावती या संस्थेच्या १० पदांना मुदतवाढ देणे आवश्यक आहे.

३. उपरोक्त सर्व बाबींचा सर्वंकष विचार करून आता, प्रस्तुत शासन निर्णयान्वये डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी,अमरावती या संस्थेच्या आस्थापनेवरील खाली नमूद केलेल्या १० अस्थायी पदांना दिनांक १ सप्टेंबर, २०१५ ते २९ फेब्रुवारी, २०१६ या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर पदांची मुदतवाढ दि.२९.०२.२०१६ पर्यंत अथवा पुढील आदेश निर्गमित होईपर्यंत अथवा संदर्भाधीन क्र.६ च्या शासन निर्णयान्वये मंजूर आकृतीबंधातील पदभरतीच्या प्रक्रियेत समदर्जाचे पद उपलब्ध होईल, यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत राहील.

| अ.क्र. | पदांची नावे | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | सहायक प्राध्यापक (तहसीलदार श्रेणी) | २ पदे | १५६००-३९१०० (ग्रेड पे-५०००) |
| २. | लेखाधिकारी, वर्ग-२ | १ पद | ९३००-३४८००(ग्रेड पे-४६००) |
| ३. | सत्र समन्वयक(नायब तहसीलदार श्रेणी) | १ पद | ९३००-३४८००(ग्रेड पे-४३००) |
| ४. | सत्र समन्वयक | १ पद | ९३००-३४८००(ग्रेड पे-४३००) |
| ५. | सत्र सहायक | १ पद | ५२००-२०२००(ग्रेड पे-१९००) |
| ६. | शिपाई | १ पद | ४४४०-७४४०( ग्रेड पे-१३००) |
| ७. | चौकीदार | १ पद | कंत्राटी पध्दतीने |
| ८. | सफाई कामगार | १ पद | कंत्राटी पध्दतीने |
| ९. | वाहन चालक | १ पद | कंत्राटी पध्दतीने |

५. याबाबत होणारा खर्च मागणी क्रमांक ए-४, मुख्य लेखाशिर्ष"२०७०-इतर प्रशासनिक सेवा-(००३) प्रशिक्षण(००)(०८) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहायक अनुदान (योजनेतर)(२०७० ०७५५) ३६- सहायक अनुदान(वेतने)"या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१५/प्र.क्र.५/१५/वित्तीय सुधारणा-१ दिनांक २० फेब्रुवारी, २०१५ अन्वये मंत्रालयीन विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये व वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र. २४५/वि.सु-१ दिनांक १.०९.२०१५ च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०२१७३३०७९७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PATIL PRATIBHA MADHAV

Digitally signed by PATIL PRATIBHA MADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 916982, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=da026e85ae8cbb4e3c2acdbecbbf2f6d6cb0ae6ed5c1e54483490119ee0456ad, cn=PATIL PRATIBHA MADHAV
Date: 2015.09.02 17:49:15 +05'30'

**(प्रतिभा मा. पाटील)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३. मा.अपर मुख्य सचिव(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
६. लेखाधिकारी, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
७. उप संचालक, लेखा व कोषागारे, अमरावती
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
९. उप कोषागार कार्यालय, अमरावती
१०. वित्त विभाग, कार्यासन- वित्तीय सुधारणा-१ व व्यय-४, मंत्रालय, मुंबई-३२
११. निवड नस्ती.